# बृहद्रूपावलिः ।

ह्या रूपावलीचा अनुक्रम कौमुदीप्रमाणेंच आहे, ह्मणजे प्रथम पुल्लिंग शब्द 'अजन्त' स्वरान्त, पुढें 'हलन्त' व्यंजनान्त ह्याप्रमाणेंच स्त्रीलिंग, नपुंसकलिंग, सर्वनाम यांचाही क्रम असाच. चालू रूपावलींतील राम, हरि इत्यादि शब्द मोठे व बाकीचे बारीक टाइपांनीं दिले आहेत. एकासारखे चालणारे दुसरे शब्द शेवटीं दिले आहेत. हिची रचना विद्यार्थ्यांस अत्युपयुक्त असून शब्द भरपूर आहेत. किंमत ४ आणे ट. खर्च आणा. दहा प्रति घेणारास टपालखर्च न पडतां एक प्रत वर मिळेल.

श्रीमच्छंकराचार्यप्रणीता

# शतश्लोकी सटीका ।

आनन्दगिरिकृतटीकासमेता

उत्तम कागदावर, सुवाच्य टाइपांनीं व गायन द्वादशपत्री पान्यानें छापलेलें व बांधलेलें बुक. किं. रु. १ ट. २ आणे.

# सिद्धान्तकौमुदी स्वरवैदिकीसमेता ।

द्वितीयावृत्ति.

अष्टाध्यायी, गणपाठ, धातुपाठ, लिङ्गानुशासन, शिक्षा व अष्टाध्यायीसूत्रांचा वर्णानुक्रमकोश, सूत्राङ्कसहित, अक्षर मोठें, वैय्याकरणांनीं शुद्ध केलेली. कापडानें बांधलेलें बुक. किं. २॥ रु. आणे.

# सुभाषितरत्नभाण्डागारम् ।

द्वितीयावृत्ति.

पूर्वीपेक्षां दीडपटीहून अधिक—ग्रंथसंख्या १०,४५० विषय-

संख्या ७४४ श्लोक सं. १०,१६८ घातल्यामुळें पृष्ठ सं. ६६६ आहे. कागद उत्तम, जाड असल्यामुळें पुस्तकही फारच मोठें झालें आहे. व शेवटीं सर्व श्लोकांची वर्णानुक्रमानें सूचीही दिली आहे. स्थलविशेषीं भरपूर टिप्पणी दिली आहे, तरी किंमत पूर्वींप्रमाणेंच फक्त रुपये ३॥. ट. ६ आणे.

श्रीमच्छंकराचार्यप्रणीता

## उपदेशसाहस्त्री सटीका ।

रामतीर्थस्वामिकृतटीकासमेता

कागद उत्तम, पुस्तक शुद्ध फारच मोठ्या टाइपांनीं व रायल अष्टपत्री सांच्यानें छापलेलें बुक, जाड पुठ्यानें बांधलेलें; किं. रु २ ट. ४ आणे. रेशमी पुठ्याची किं. रु. २॥ ट. ४ आणे.

## क्रियापदप्रकाशः ।

OR

A GUIDE TO SANSKRIT VERBS,

*Parts I. And II.*

Containing a full conjugation in all tenses and moods with important rules of almost all the important Sanskrit verbs, by MR. GOVIND SHANKARA SHASTRI BAPAT. The first part of the Book, containing the conjugational tenses only, was published some years ago, and is already known to the public.

*Price 12 Annas.* *Postage 1 Anna.*

॥ श्रीः ॥

# लघुयोगवासिष्ठसारः

श्रीमहीधरकृतसंस्कृतटीकया

आठल्यउपाह्वरामकृष्णशास्त्रिसूनुश्रीकृष्णशास्त्रि-

कृतेन प्राकृतभाषानुवादेन च

संयुतः ।

सोऽयम्

पुण्यनगर्याम्

गुर्जरोपाख्यमहादेवात्मजजनार्दनेन

'कर्नाटकप्रेस' नाम्नि मुद्रायन्त्रालयेऽङ्कित्वा

प्रकाशितः

ख्रिस्ताब्दः १८८९. शकाब्दः १८११.



मूल्यम् १२ आणकाः

॥ श्री ॥

इदं पुस्तकं

आटल्यटल्पुराधिपेभ्यो हरिरामसूनुभ्यो वासुदेवाभिधे-
भ्यो रत्नागिरिस्थन्यायसभान्वेनिवकीलसंज्ञकेभ्यः स्व-
पितृव्येभ्यस्त[illegible]नाजिज्ञासाद्यनेकगुणलोलुपेन
पुस्तककर्त्रा संमानपुरःसरं

॥ समर्पितम् ॥

# उपोद्घातः

यतः सर्वाणि भूतानि प्रभवन्ति स्थितानि वै ॥
यत्रैवोपशमं यान्ति तस्मै सत्यात्मने नमः ॥

योगवासिष्ठे ।

सर्व शास्त्रांमध्यें वेदांत शास्त्रासारखें दुसरें शास्त्र नाहीं. कारण त्यामध्यें खरोखर प्रत्येकाचें हित ह्मणजे काय हें समजतें. आतां बाकी शास्त्रांचा उपयोग नाहीं असें नाहीं, तर तीं लौकिकोपयोगी असून शिवाय या शास्त्राशीं त्यांचा उपकार्योपकारक संबंधही आहे. कारण न्याय, योग, मीमांसा इत्यादिकांच्या ज्ञानावांचून वेदांतशास्त्रांतील ग्रंथाचें मर्म समजण्यास कठीण पडतें. श्रीमच्छंकराचार्यांसारखे जे श्रेष्ठ पुरुष होऊन गेले त्यांनीं सर्व शास्त्रांचें अध्ययन करून व शोध करून अन्य लौकिक शास्त्रांकडे विशेष लक्ष न देतां जगताच्या कल्याणार्थ प्रस्थानत्रयीवर भाष्य करून शिष्यांना त्याचें अध्यापनही केलें. तेणेंकरून भवभंगापासून मुक्त असे अनेक जन मुक्तीप्रत गेले. असें इतिहासावरून वगैरे स्पष्ट होतें करितां त्या शास्त्रांतील ग्रंथांचें अध्ययन अवश्य पाहिजे.

हाल्लीं शब्दपांडित्य करणारे वेदान्ती मात्र पुष्कळ आढळतात परंतु साधनचतुष्टयसंपन्न असून खरे वैराग्यसंपन्न असे क्वचितच. अगदीं नाहीं असें मात्र नाहीं. कारण ते मुळींती दिशाच चुकतात. लक्ष्मणानें श्रीरामाला प्रश्न केला तेव्हां रामानीं सांगितलें, कीं अगोदर स्ववर्णाश्रमक्रिया करून मनशुद्धि झाल्यानंतर मग आत्मप्राप्ति होण्याकरितां सद्गुरूचा आश्रय करावा. यावरून अगोदर मनाची शुद्धि झाली पाहिजे. प्रत्येक शास्त्रामध्यें या शास्त्राचा अधिकारी कोण त्याचें लक्षण काय हें आरंभीं सांगितलेलें असतें. तेव्हां वेदान्तशास्त्राचें अध्ययन, मार्गानें करण्यास काय साधनें पाहिजेत याचा विचार करून जो त्याचें अध्ययन करितो त्याला त्याचा उपयोग झाल्यावांचून रहाणार नाहीं.

वेदान्तशास्त्रावर अनेक ग्रंथ आहेत, त्यांत मुख्य प्रस्थानत्रयी.

परंतु त्याचेच खालोखाल योगवासिष्ठ हा ग्रंथ आहे. त्यांत सर्व अध्यात्मविषय असून तो विषय व्यवहारांतील दाखले देऊन श्रोत्यांचें मनांत भरण्यासारखा प्रतिपादन केलेला आहे. यांतील निवडक श्लोक काढून "लघुयोगवासिष्ठसार" असा ग्रंथ केलेला आहे. त्यांतही प्रकरणवार विषय असून थोडक्यांत बोध होण्या जोगा हा ग्रंथ आहे. ह्मणून त्याचा सर्वांस उपयोग व्हावा अशा हेतूनें त्याचें भाषान्तर केलें आहे.

योगवासिष्ठ ग्रंथ केव्हां, कोणी, कोणाला सांगितला याविषयीं एक आख्यायिका मोठ्या योगवासिष्ठग्रंथांत आहे. ती अशी— सुतीक्ष्णनामा ऋषि कांहीं संशयानें युक्त होऊन त्या संशयाचा परिहार करावा ह्मणून आपले गुरु जे अगस्ति त्यांच्या आश्रमास गेला आणि त्यानें वंदन करून प्रार्थना केली कीं महाराज, मला एक संशय उत्पन्न झाला आहे करितां कृपा करून त्या संशयापासून दूर करावें. मोक्षाला साधन ज्ञान किंवा कर्म, अथवा दोन्ही? याचा निश्चय करून कांहीं तरी एक सांगावें. याप्रमाणें शिष्याचें वाक्य श्रवण करून अगस्ति बोलले, ज्याचारें दोन पक्षांनीं जशी पक्ष्यांची गति आकाशांत होते त्याप्रमाणें दोनही साधनांनीं परमपदप्राप्ति होते. केवल कर्मानें अथवा केवळ ज्ञानानें मोक्षप्राप्ति होत नाहीं. ह्मणून तीं दोन्हीं मोक्षाला साधनीभूत आहेत. याविषयीं पूर्वीची कथा सांगतों ती ऐक—

पूर्वीं कारुण्य या नामें करून कोणी एक ब्राह्मण ज्यानें संपूर्ण वेदवेदांगांचें अध्ययन केलेला असा होता. त्याचे बापाचें नांव अग्निवेश्य असें होतें. पुढें तो कारुण्य गुरुगृहीं अध्ययन करून घरीं आला. नंतर कर्माविषयीं संशययुक्त मन असल्यामुळें कांहीं कर्म न करितां स्वस्थ राहिला. तेव्हां अग्निवेश्य तो पुत्राची स्थिति पाहून बोलला कीं, हें तूं काय करतोस स्वकर्माचें पालन कां करीत नाहींस. व असेंच कर्म न करशील तर सिद्धि कशी होईल. शिवाय कर्मापासून निवृत्त होण्यास कारण काय तें सांग. असें बापाचें भाषण श्रवण करून कारुण्य ह्मणाला—

॥ यावज्जीवमग्निहोत्रं नित्यं संध्यामुपासयेत् ॥
॥ प्रवृत्तिरूपो धर्मोऽयं श्रुत्या स्मृत्या च चोदितः ॥

अर्थ—यावजीव अग्निहोत्र करावें. नित्य संध्या करावी असा प्रवृत्तिरूप धर्म श्रुति व स्मृतीनें सांगितला आहे.

॥ न धनेन भवेन्मोक्षः कर्मणा प्रजया न वा ॥
॥ त्यागमात्रेण किंत्वेते यतयोऽश्नन्ति चामृतम् ॥

अर्थ—धनानें, कर्मानें किंवा पुत्रादिकांनीं मोक्ष नाहीं तर त्यागानें मात्र यति मोक्षाला पावले असें कोणी ह्मणतात. याप्रमाणें दोन श्रुत्यर्थ आहेत तेव्हां आतां मी कोणता करावा? याकरितां मी कर्माविषयीं स्तब्ध राहिलों दुसरें कांहीं कारण नाहीं.

याप्रमाणें पुत्राचें भाषण झाल्यानंतर अग्निवेश्य पुनः बोलला कीं, मुला, याविषयीं तुला एक कथा सांगतों ती ऐक व त्याचा विचार करून मग जें तुला वाटेल तें कर.

सर्व अप्सरांमध्येंही श्रेष्ठ अशी सुरुचि या नामें करून कोणी एक अप्सरा होती. ती ज्याठिकाणीं किन्नर नानाप्रकारच्या क्रीडा करितात व जेथें गंगाप्रवाह पडतो अशा हिमाचल शिखरावर बसली असतां आकाशांतून इंद्रदूत जातानां तिनें पाहिला. आणि त्याला हाक मारून विचारिलें कीं, हे देवदूत, तूं कोठून आलास आणि पुढें कोठें जाणार? तेव्हां तो दूत बोलला, अरिष्टनेमी राजर्षि सर्व राज्यभार पुत्रावर ठेवून आपण गंधमादन पर्वतावर तप करीत आहे त्याजकडे कांहीं कामाकरितां गेलों होतों. तें काम करून आतां तो वृत्तांत निवेदन करण्याकरितां इंद्राकडे जात आहें. तेव्हां अप्सरेनें वृत्तांताविषयीं प्रश्न केल्यावरून दूत बोलला. अप्सरे ऐक. तो राजा त्या पर्वतावर दुर्धर तप करितो असें जाणून इंद्रानें त्याला आपल्याकडे आणण्याकरितां मला विमान देऊन पाठविलें. नंतर त्या राजानें स्वर्गसंबंधी गुणदोष विचारिल्यावरून मी ते सर्व सांगितले. तेव्हां तो राजा बोलला कीं, अशा नश्वर सुखाची मला इच्छा नाहीं मी या तपानें हा देह दग्ध करीन. तूं हें विमान घेऊन इंद्राकडे परत जावें. नंतर मी पुनः तें विमान घेउन इंद्राकडे

गेलों तेव्हां इंद्रानें पुनः मला आज्ञा केली, कीं तूं त्या राजाला घेऊन वाल्मीकिच्या आश्रमाला जा आणि वाल्मीकींस त्या राजाला बोध करण्या विषयीं माझा निरोप सांग, कीं जेणें करून तो मोक्ष पद पावेल. त्याप्रमाणें मी राजाला ऋषीकडे नेऊन इंद्राचे आज्ञेप्रमाणें सर्व केलें. आतां पुनः स्वर्गलोकीं जात आहें. नंतर पुढें राजानें वाल्मीकींस प्रश्न केल्यावरून त्यानीं वसिष्ठ रामसंवाद रूपानें राजास बोध केला. त्याला वासिष्ठ महारामायण (योगवासिष्ठ) असें ह्मणतात.

हा ग्रंथ फार मोठा आहे. परंतु कांहीं सुजनांनीं त्यांतील वेचक श्लोक काढून प्रकरणवार लघुयोगवासिष्ठ ह्मणून ग्रंथ केला. तोहि बराच मोठा आहे करितां अल्पमतीस त्याचें मार्मीक ज्ञान व्हावें ह्मणून कोणी पंडितानें त्यांतीलही सारभूत श्लोक घेऊन त्याला "**लघुयोगवासिष्ठसार**" असें नांव दिलें. यांत दहा प्रकरणें असून २२३ श्लोक आहेत. प्रत्येक श्लोकांत जो विषय प्रतिपादन केला आहे त्याविषयीं व्यवहारांतील दाखलाहि त्यांतच दिलेला आहे तेणेंकरून वाचक किंवा श्रोता यांला तात्काल बोध होण्याजोगा आहे.

हा वेदान्तविषय असल्यामुळें किती जरी विशद केला तरी पारिभाषिक शब्द समजल्याशिवाय व्हावा तसा सुबोध होईल असें वाटत नाहीं, तथापि जितका स्पष्ट करवेल तितका करण्याचा यत्न केला आहे.

हें भाषांतर करतानां तीन प्रती मिळाल्या होत्या. एक स्वतः घरची. दुसरी श्री० रा० रा० रावसहेब मंडलिक यांचे ग्रंथालयांतलि व तिसरी साताऱ्यास रहाणारे माझे स्नेही रा० रा० चिन्तामण अनंत भिसे उर्फ बाबुराव यांची. या तीन प्रतीवरून मूळ शुद्ध करून भाषांतर केलें आहे.

या माझ्या कृतीचें ग्रहण सज्जन हंसक्षीरन्यायानें करोत अशी त्यांची सविनय प्रार्थना करितों.

**श्री० शा० आठल्ये.**

भाषान्तर कर्ता

|| श्रीभवानीखड्गेश्वरौ जयतः ||

# अथ लघुयोगवासिष्ठसारः

## वैराग्यं प्रथमं प्रकरणम्.

दिक्कालाद्यनवच्छिन्नानन्ताचिन्मात्रमूर्तये ॥
स्वानुभूत्यैकमानाय नमः शान्ताय तेजसे ॥१॥

लक्ष्मीकांतं नमस्कृत्य यथामति निरूप्यते ॥ वासिष्ठसार विवृतिः परोपकृतये मया ॥ १ ॥ वसिष्ठेन यतीन्द्रेणोपदिष्टा राघवं प्रति ॥ सारमुद्धृतवान्कश्चिद्ब्रह्मविद्यामहार्णवात् ॥२॥ तत्रादौ वासिष्ठसाराख्यं ग्रन्थमारिप्सुस्तत्प्रतिपाद्येष्टदेवतानतिरूपं मङ्गलमाचरति ॥ ॥ दिक्कालेति ॥ ॥ एवं विधाय शान्ताय गुणातीताय तेजसे ब्रह्मरूपाय नमः ॥ तेजःशब्देनात्र ब्रह्मैव न भौतिकं तेजः तस्य वक्ष्यमाणलक्षणानुपपत्तेः ॥ किंभूताय तेजसे ॥ दिक्कालादिभिरनवच्छिन्ना च इयत्तया अपरिच्छिन्ना अनन्ता अविनाशिनी चिन्मात्रा ज्ञानरूपामूर्तिः स्वरूपं यस्य तस्मै ॥ पुनः स्वानुभूतिः स्वानुभव एव एकं मानं प्रमाणं यत्र तस्मै अनुभवैकवेद्याय " अवचनेन प्रोवाचेति " श्रुतेः ॥ १ ॥

ग्रंथारंभीं ग्रंथकर्ता ग्रंथसमाप्ति निर्विघ्नपणानें व्हावी ह्मणून आपले इष्ट देवतेला वंदन करितो. जें दिशा, काल इत्यादिकांनीं अनवच्छिन्न ह्म० मोजलें जात नाहीं व केवळ चिन्मात्र मूर्ति ह्म० तेजच आहे स्वरूप ज्याचें असें, आणि स्वानुभवच आहे प्रमाण ज्यास, व शांत आणि तेजस्वी असें जें ब्रह्म त्याला नमस्कार करितो, ॥ १ ॥

अहं बद्धो विमुक्तः स्यामिति यस्यास्ति निश्चयः ॥

नात्यन्तमज्ञो नो तज्ज्ञः सोऽस्मिञ्छास्त्रेऽधिकारवान्॥२॥

एवं मङ्गलं विधायात्र शास्त्रेऽधिकारिणं दर्शयति ॥ अहं बद्ध इति ॥ रागद्वेषादिना बद्धोऽहं कथं मुक्तो भवेयमिति यस्य निश्चयोऽस्ति । अत एव नात्यंतमज्ञो मूर्खो नापि ज्ञः पण्डितः सोऽत्र शास्त्रेऽधिकारी ॥ ब्रह्मज्ञस्य तु ज्ञातृत्वादेव नाधिकारः मूर्खस्योपदेशवैयर्थ्यादेवाधिकाराभावः ॥ तस्मात्किञ्चिदज्ञो विवेकी अधिकारी श्रवणायेत्यर्थः ॥ २ ॥

याप्रमाणें वंदन करून याविषयीं अधिकारी कोण तो सांगतात. जो कोणी मी बद्ध आहें, मुक्त होईन असा ज्याचा निश्चय आहे व जो फार ज्ञानी नाहीं व अज्ञानीही नाहीं तो या शास्त्राचा अधिकारी समजावा. ॥ २ ॥

यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेश्वरात् ॥
तावन्न सद्गुरुं कश्चित्सच्छास्त्रं वापि नो लभेत्॥३॥

एवमधिकारिणं निरूप्य सद्गुरुसेवादिकं ब्रम्हाज्ञानसाधनं निरूपयति ॥ यावदिति ॥ यावत्परमेश्वरात्साक्षादनुग्रहो न जायते ॥ तावत्कश्चिदपि पुमान् सद्गुरुं सच्छास्त्रं च नाभ्यसेत् ॥ गुरुसेवा सच्छास्त्राभ्यासश्च परमेश्वरानुग्रहादेव भवतीत्यर्थः ॥ ३ ॥

याप्रमाणें अधिकारी सांगून ब्रह्मज्ञानाला साधन जी गुरुसेवा, ती सांगतात. जोंपर्यंत परमेश्वराचा अनुग्रह झाला नाहीं, तोंपर्यंत सद्गुरु किंवा सच्छास्त्र यांची प्राप्ति होत नाहीं तेव्हां गुरुसेवा किंवा सच्छास्त्राभ्यास हीं परमेश्वराचे अनुग्रहानेंच होतात. ॥ ३ ॥

महानुभावसंपर्कात्संसारार्णवलंघने ॥
युक्तिः संप्राप्यते राम दृढा नौरिव नाविकात्॥४॥

ननु गुरुसेवया किंस्यादित्यत आह । महानुभावेति । महानु-

भावस्य ब्रह्मज्ञस्य गुरोः संपर्कात्सेवया संसारसमुद्रतरणे युक्तिः उपायः प्राप्यते ॥ नाविकाद्यथा समुद्रतरणे दृढा तारणसमर्था नौ प्राप्यते ॥ गुरूपादिष्टमार्गेण संसारस्तीर्यत इत्यर्थः ॥ ४ ॥

वसिष्ट ह्मणतात, रामा, गुरुसेवेनें फल काय ह्मणशील तर जशी नाविकापासून अल्प समुद्र तरण्याविषयीं नौकेची प्राप्ति होते; त्याप्रमाणें ब्रह्म जाणता जो गुरु त्याचे सेवेनें संसारसमुद्र तरण्याविषयींच्या उपायाची प्राप्ति होते. ॥ ४ ॥

संसारदीर्घरोगस्य सुविचारो महौषधम् ॥
कोहं कस्य च संसारो विवेकेन विलीयते ॥५॥

गुरूपदेशमहिमानमाह संसारेति ॥ अहं कः कस्य वा संसार इति यो विचारः संसाररूपदीर्घरोगस्य महौषधम् ॥ यतो विवेकेनैव संसारो विलीयते नश्यति ॥ यथौषधेन रोगशान्तिस्तथा विचारेण संसारशान्तिरिति भावः ॥ ५ ॥

आतां गुरूपदेशाचा महिमा सांगतात. मी कोण, व संसार कोणाचा याप्रमाणें जो विचार तेंच या संसाररूपी महारोगाला औषध आहे. जशी औषधापासून रोगाची शांति होते तशी या विचारापासून संसाराची शान्ति होते. ॥ ५ ॥

यस्मिन्देशे हि तत्वज्ञो नास्ति सज्जनपादपः ॥
सफलः शीतलच्छायो न तत्र दिवसं वसेत् ॥६॥

यस्मिन्निति ॥ यस्मिन्देश एवं विधः सज्जनपादपः सत्पुरुषवृक्षो नास्ति तत्र दिवसमपि नैव वसेत् ॥ न दिनं स्थातव्यं तत्वबुभुत्सुना ॥ कीदृशः सज्जनवृक्षः तत्वज्ञः तत्वं पदार्थो विवेकेन जानातीति ॥ तत्वं ब्रह्मरूपं जानातीति वा ॥ सफलः फलेन ब्रह्मज्ञानोपायेन सहितः ॥ शीतला आनंदकारिणी च्छाया कांतिर्यस्य ॥ तत्वं वृक्षत्वं जानाती

ति ॥ यत्र ईदृशः फलसहितो घनच्छायो वृक्षस्तत्वज्ञानी वा नास्ति तत्र दिनं न वसेदिति ध्वनिः ॥ ६ ॥

ज्या देशामध्यें तत्त्वं पदार्थातें विवेकानें जाणणारा व शीतल छायायुक्त व ब्रह्मज्ञानोपायरूपफलानें युक्त असा सज्जनवृक्ष नाहीं तेथें तत्वज्ञानभोगेच्छूनें एक दिवसही राहूं नये. ॥ ६ ॥

सदा संतोभिगन्तव्या यद्यप्युपदिशन्ति न ॥
या हि स्वैरकथास्तेषामुपदेशा भवन्ति ताः॥७॥

सदोति ॥ सत्पुरुषाः यद्यपि उपदेशं न ददति तथाप्य-भिगन्तव्याः सेव्याः सदा ॥ यतस्तेषां याः स्वच्छाकथास्ता एवोपदेशाः। सतां ब्रह्मकथयैव कालनिर्गमनादित्यर्थः ॥ ७ ॥

सत्पुरुषांचे संगतीचें फल सांगतात. जरी सत्पुरुषांनीं उपदेश केला नाहीं तरी ते सतत सेवा करण्यास योग्य आहेत. कारण, त्यांचा नित्य भाषणादि व्यवहार व आचार हीं उपदेशरूपी आहेत. ॥ ७ ॥

शून्यमापूर्णतामेति मृत्युरप्यमृतायते ॥
आपत्संपदिवाभाति विद्वज्जनसमागमात् ॥ ८ ॥

शून्यमिति ॥ सत्पुरुषसङ्गाच्छून्यं पूर्णभावं प्राप्नोति ॥ मृत्यु-रप्यमृतो भवति ॥ आपद्दुःखमपि सुखरूपं भवति ॥ वस्तुतः शून्यमृत्युदुःखानां ब्रह्मण्यभावादित्यर्थः ॥ ८ ॥

पुनः तेंच फल सांगतात. साधूंच्या संगतीपासून शून्य वस्तु पूर्णत्वाला पावते. मृत्यु अमृत्यु होतो. दुःखही सुखस्वरूपाला पावतें. एवंच ज्या ब्रह्मामध्यें या तीघांचा अभाव आहे अशा ब्रह्माची प्राप्ति त्यांच्या संगतीनें होते. ॥ ८ ॥

ज्ञानिनामपि चित्तं चेत्केवलात्मसुखोदितम् ॥

सत्वाः संसारदुःखार्ताः कं यान्ति शरणं तदा ॥९॥

ज्ञानिनः सर्वथा दीनं शरणागतं दृष्ट्वोपदिशन्त्येवेत्याह ॥ ज्ञानिनामपि चित्तं केवलमात्मसुखायैवोदितं चेत्तदा संसार-दुःखव्याप्ताः प्राणिनः कं शरणं यान्ति ॥ तस्माज्ज्ञानिनः परोपकाररता भवंन्तीति भावः ॥ ९ ॥

ज्ञानीजन शरणागताला उपदेश करितात याविषयीं सांगतात. ज्ञान्याचें चित्त जर स्वात्मसुखाकरितांच असेल तर संसारदुःखानें युक्त असे प्राणी कोणाला शरण जातील. ह्मणून ज्ञानी हे परोपकार करण्याविषयीं तत्पर असतात असें निश्चयानें समजावें. ॥९॥

तज्ज्ञानं सच शास्त्रार्थस्तद्विज्ञानमखण्डितम् ॥
सच्छिष्याय विरक्ताय साधु यच्चोपदिश्यते ॥१०॥

किंच तज्ज्ञानमिति ॥ तदेव ज्ञानं स एव शास्त्रार्थः तदेवाखण्डितं विज्ञानमनुभावो यद्विरक्ताय सच्छिष्यायोपदिश्यते ॥ १० ॥

विरक्त सच्छिष्याला जें सद्गुरु उपदेश करितात तेंच तत्वज्ञान, तेंच शास्त्रार्थ आणि तेंच अखंडित विज्ञान समजावें. ॥१०॥

उपदेशक्रमो राम व्यवस्थामात्रपालनम्॥
ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धं शिष्यप्रज्ञैव केवला ॥११॥

उपदेशेति ॥ हे राम रघुनाथ ॥ गुरूपदेशक्रमस्तु मर्यादापालनमेव ॥ ब्रह्मज्ञानस्य अयमात्मा ब्रह्मेति महावाक्यार्थोपदेशदृढीकरणस्य कारणन्तु शिष्यप्रज्ञैव केवला नान्यदित्यर्थः ॥ शिष्यप्रज्ञानं विनोपदेशोऽनर्थक इत्यर्थः ॥ ११ ॥

वसिष्ठ ह्मणतात, रामा, गुरूपदेशक्रम ह्मटला ह्मणजे मर्यादा पालन करणें हाच आहे. आतां जीवात्मा हाच ब्रह्म आहे असा

प्रीति करितो त्याला पुरुष न ह्मणतां गर्दभ ह्मणावें. कारण, विषयाचे ठिकाणीं लंपट होणें हें उभयतांचें सारखेंच आहे तेव्हां जर विषयाचे ठिकाणीं पराङ्मुख होत नाहीं तर अन्तर काय? ॥ १६ ॥

यत्किञ्चिदपि संकल्पान्नरो दुःखे निमज्जति ॥
न किञ्चिदपि संकल्पात्सुखमक्षय्यमश्नुते ॥ १७ ॥

यत्किञ्चिदिति ॥ कस्यापि पदार्थस्य संकल्पान्नरो नरकमाप्नोति ॥ संकल्पाभावे चाक्षयं मोक्षसुखमेवाप्नोति ॥ १७ ॥

थोडक्याही संकल्पानें मनुष्य दुःखामध्यें बुडतो आणि यत्किंचितही संकल्प न केल्यानें मुक्त होतो. करितां थोडाही संकल्प करूं नये. ॥ १७ ॥

यथा स्वप्ने मुहूर्ते स्यात्संवत्सरशतभ्रमः ॥
तथा मायाविलासोयं जायते जाग्रति भ्रमः ॥ १८ ॥

यथेति ॥ मुहूर्तकालमात्रस्वप्ने यथा शतसंवत्सरभ्रमो भवति एवं जाग्रदवस्थायामयं संसारो मायाविलासरूपो मरीचिकावन्मिथ्याभूत इत्यर्थः ॥ १८ ॥

मुहूर्तमात्र स्वप्नामध्यें जसा शत संवत्सराचा भ्रम होतो त्याप्रमाणें जागृदवस्थेंत ह्या मायायुक्त संसाराचा भ्रम मृगजलाप्रमाणें आहे. ह्मणून हा संसार मिथ्या आहे. ॥ १८ ॥

योन्तः शीतलया बुध्या रागद्वेषविमुक्तया ॥
साक्षिवत्पश्यतीदं हि जीवितं तस्य शोभते ॥ १९ ॥

योन्त इति ॥ यो नरो रागद्वेषराहितयाऽत एवान्तः शीतलया सानन्दया बुध्या साक्षिवदिदं विश्वं लोकयति तस्यैव जीवितं शोभते ॥ रागद्वेषत्यागे मुक्तिरित्यर्थः विषयसुखेष्वासक्ती रागः दुःखेष्वप्रीतिर्द्वेषः ॥ १९ ॥

राग ह्मणजे विषयसुखाचे ठिकाणीं प्रीति व द्वेष ह्मणजे दुःखाचे ठिकाणीं अप्रीति तेव्हां या दोहोंनीं रहित व अंतःशान्त अशा बुद्धीनें जो हें जगत् साक्षीभूत आहे असें पहातो, त्याचें आयुष्य शोभतें, ह्मणजे तो जन्माला येऊन उपयोग, नाहीं तर व्यर्थ असें समजावें ॥ १९ ॥

येन सम्यक् परिज्ञातं हेयोपादेयमुज्झता ॥
चित्तस्यान्ते स्थितं चित्तं जीवितं तस्य शोभते ॥ २०

येनेति ॥ हेयोपादेयमुज्झता त्यजता इदं मया ग्राह्यमिदं मया त्याज्यमिति संकल्पं त्यजता सता येन बुद्धौ प्रतिबिंबितं चैतन्यं ब्रह्म सम्यक् ज्ञातं तस्य जीवितं सफलमित्यर्थः॥२०॥

आतां हें ग्राह्य आणि हें त्याज्य अशी बुद्धी टाकून ज्याणें बुद्धीचें ठिकाणीं चांगल्याप्रकारें प्रतिबिंबित असें ब्रह्म जाणलें आहे त्याचें जीवित सफल समजावें. ॥ २० ॥

हृदयाकाशमात्रस्य विनाशो देहनाशतः ॥
व्यर्थं भूतानि शोचन्ति नष्ट आत्मेति शंकया ॥ २१॥

इदानीं मरणनिमित्तः शोको न कार्य इत्याह ॥ हृदयेति ॥ देहनाशाद्धृदयावच्छिन्नस्याकाशस्यैव नाशो नभसोवच्छिन्नत्वं नश्यति ॥ यथा घटनाशे घटावच्छेद एव नश्यति नत्वाकाशस्तथा शरीरनाशेऽपि देहसंबन्ध एव नष्टो नत्वात्मा नश्यति ॥ अतो जना मूढा आत्मा नष्ट इत्युक्त्वा मिथ्यैव शोकं कुर्वंति ॥ २१ ॥

आतां मरणनिमित्त शोक करूं नये अशाविषयीं सांगतात. घटाचा नाश झाल्यानंतर जसा घटाकाशाचा नाश होतो, त्याप्रमाणें देहनाशानें हृदयाकाशाचा नाश होतो; परंतु अज्ञानी लोक उगाच आत्मा नष्ट झाला असें समजून शोक करितात ॥ २१ ॥

घटादिषु प्रनष्टेषु यथाकाशमखण्डितम् ॥
तथा देहेषु नष्टेषु देही नित्यमलेपकः ॥ २२ ॥

तदेवाह । घटादिष्विति ॥ घटादिषु प्रनष्टेष्वाकाशमखण्डितमेव ॥ तथा देहनाशेऽपि देही पुरुषोऽखण्डित एव निर्लेपक एवेत्यर्थः ॥ २२ ॥

घट नष्ट आला असतां जसें आकाश नष्ट न होतां अखंडित राहतें, तसा देह नष्ट झाला असतां आत्मा नष्ट न होतां अलिप्त असतो. ॥ २२ ॥

न जायते म्रियते वा क्वचित्किञ्चित्कदाचन ॥
जगद्विवर्तरूपेण केवलं ब्रह्म जृम्भते ॥ २३ ॥

केवलं ब्रह्मैव जृंभत इत्याह । न जायत इति ॥ क्वचित्किंचिन्नोत्पद्यते न च नश्यति किंतर्हि ब्रह्मैव जगद्विवर्तस्वरूपेण प्रकाशते ॥ यथा रज्जौ कालत्रयेऽपि सर्पादिकं नास्ति तथापि रज्जौ सर्पो जायते नश्यति च भ्रमवशात्तथा संसारो विवर्तपादस्यैव मुख्यत्वादित्यर्थः ॥ २३ ॥

जगताला व्यापून जो ब्रह्मस्वरूपी आत्मा तो कधीं उत्पन्न होत नाहीं व मरत नाहीं तर निरंतर ब्रह्मस्वरूपानेंच जगतामध्यें भासतो. ॥ २३ ॥

आकाशादपि विस्तीर्णः शुद्धः सूक्ष्मोऽव्ययः शिवः ॥
अयमात्मा कथं राम जायते म्रियतेऽथ वा ॥ २४ ॥

आकाशादिति ॥ हे राम य ईदृशः आत्मा स कथं जायते म्रियते वा ॥ कीदृशः आकाशादपि व्यापकः ॥ शुद्धो निर्मलः निर्लेपः । सूक्ष्मो दुर्ज्ञेयः । अव्ययोऽविनाशी । शिवो मंगलरूपः । नहि देशकालस्वरूपपरिच्छेदरहितस्य जन्मनाशौ संभवत इत्यर्थः ॥ २४ ॥

वसिष्ट ह्मणतात, रामा, हा आत्मा आकाशाहून व्यापक आहे व निर्लेप आहे तसाच दुर्ज्ञेय, अव्यय ह्मणजे अविनाशी, मंगलस्वरूपी असा आहे. देशकालादिकानें ज्याचा परिच्छेद होत नाहीं अशाला जन्म व नाश कसे संभवतील ॥ २४ ॥

सर्वमेकमिदं शान्तमादिमध्यान्तवर्जितम् ॥
भावाभावविनिर्मुक्तमिति मत्वा सुखी भव ॥ २५ ॥

सर्वमिति ॥ इदं दृश्यमानं सर्वं जगदादिमध्यान्तवर्जितं भावाभावारहितं ब्रह्मैव ज्ञेयमिति मत्वा सुखी भव ॥ २५ ॥

आतां दृश्यमान जें हें जगत् तें आदि, मध्य, आणि अंत यांणीं रहित, शांत, व भाव व अभाव रहित, असें ब्रह्मच आहे असें मानून सुखानें राहा. ॥ २५ ॥

वरं शरावहस्तस्य चाण्डालागारवीथिषु ॥
भिक्षार्थमटनं राम न मौर्ख्यहतजीवितम् ॥ २६ ॥

ईदृक्ज्ञानं विना जीवितं व्यर्थमित्यत्राह । वरमिति ॥ हे राम हस्ते खर्परं गृहीत्वा चाण्डालगृहेषु भिक्षार्थं गमनं श्रेयो न त्वात्मज्ञानरहितं जीवितमित्यर्थः ॥ २६ ॥

हे रामा, हातामध्यें परळ घेऊन चांडालादि नीचगृहीं भिक्षार्थ फिरणेंही कदाचित् चांगलें परंतु आत्मज्ञान रहित असणें हें अत्यंत वाईट. ॥ २६ ॥

न व्याधिर्न विषं नापत्तथान्यद्वापि भूतले ॥
दुःखाय स्वशरीरोत्थं मौर्ख्यमेतद्यथा नृणाम् ॥ २७ ॥

एतदेव विवृणोति न व्याधिरिति । व्याधिर्वातपित्तकफोत्थव्यथा विषापदादयो नराणां तथा दुःखदा न भवन्ति । यथा सहजं शरीरोत्थं देहसंभवं मूर्खत्वमात्मानात्मविवेकज्ञान-

**रहितं बाहिर्मुखं त्वमित्यर्थः ॥ २७ ॥ इति लघुयोगवासिष्ठसारविवरणे वैराग्यप्रकरणे टीकायां प्रथमं प्रकरणम् ॥ १ ॥**

शरीरांत त्रिदोषापासून होणारे व्याधी किंवा साक्षात् विष, अथवा आपत्ति हीं तशीं दुःखद होत नाहींत तर जसें स्वशरीरांत उत्पन्न होणारे मौर्ख्य ह्मणजे आत्मानात्मविचारराहित्य दुःख देणारें होतें. ह्मणून आत्मज्ञानाविषयीं उद्युक्त व्हावें. ॥ २७ ॥ इति प्राकृत भाषांतरांतील वैराग्यप्रकरण समाप्त झालें.

# जगन्मिथ्यात्वं द्वितीयं प्रकरणम्

संयमान्मनसः शान्तिमेति संसारसंभ्रमः ॥
मन्दरे स्पन्दतां याते यथा क्षीरमहार्णवः ॥ १ ॥

**इदानीं जगतो मिथ्यात्वं निरूपयति ॥ संयमादिति । मनोनियमनात्संसारभ्रमो नश्यति ॥ यथा मंदरगिरौ निश्चलतां याते सति क्षीरसमुद्रो वीचिरहितो भवति ॥ १ ॥**

मनाच्या नियमनानें ह्मणजे मन स्वाधीन ठेवल्यानें आपोआप संसार शांत होतो जसा मंदराचलपर्वत स्थिर होण्यावरोबर क्षीरसमुद्र शान्त होतो. ॥ १ ॥

चित्तोन्मेषनिमेषाभ्यां संसारस्योदयक्षयौ ॥
वासनाप्राणसंरोधादनिमेषं मनः कुरु ॥ २ ॥

**चित्तोन्मेषेति । यतो मनसः संकल्पे संसारोदयः । तदभावे संसाराभावः । अतो वासनाप्राणयोर्निरोधात्संकल्परहितं मनः कुरु ॥ प्राणायामाभ्यासाद्वासनानाशमनो जय इत्यर्थः २**

ज्या हेतुस्तव मनाचे संकल्पापासून संसार उत्पन्न होतो, त्या संकल्पाचा नाश झाला असतां संसारनाश सहज होईल. कारण, कारणाचा नाश झाला ह्मणजे कार्याचा नाश सहज होतो. ॥ २ ॥

अयं हि स्वविकल्पोत्थः स्वविकल्पपरिक्षयात् ॥
क्षीयते दग्धसंसारो निःसारो नात्र संशयः ॥ ३ ॥

अयमिति । अयं मनसः संकल्पादुत्थितः संसारः निजसंकल्पनाशादेव नश्यति । अत्र न संदेहः ॥ ३ ॥

हा स्वतःचे विकल्पापासून झालेला जो संसार तो विकल्पाचे क्षयानें निःसार होत्साता निश्चयानें नाश पावतो याविषयीं संशय नाहीं. ॥ ३ ॥

परिज्ञानेन सर्पत्वं चित्रसर्पस्य नश्यति ॥
यथा तथैव संसारः स्थित एवोपशाम्यति ॥ ४ ॥

परिज्ञानेनेति । चित्रलिखितसर्पस्य यथा ज्ञानादेव सर्पत्वं नश्यति तत्कृताभीतिश्च तथा आत्मब्रह्मज्ञानादेव संसारः शाम्यति वस्तुतो नास्तीत्यर्थः यथा चित्रे सर्पस्तद्वत् ॥ ४ ॥

चित्रसर्पावरील सर्पभ्रम जसा खऱ्या सर्पज्ञानानें भीतिसहित नाश पावतो, तसा आत्मा व ब्रह्म ह्यांच्या ज्ञानानें संसार नाश पावतो. ह्मणजे सर्व ब्रह्ममय आहे अशी बुद्धि झाली असतां संसारभय रहात नाहीं. ॥ ४ ॥

पुंसो निजमनोमोहकल्पितो दुःखदः स्मृतः ॥
संसारचिरवेतालो विचारेण विलीयते ॥ ५ ॥

पुंस इति । पुंसः पुरुषस्य स्वकीयमनसो मोहेनैव कल्पितो रचितः संसारलक्षणोबहुकालीनोवेतालः प्रेतस्तत्व विचारेणैव शाम्यति । तस्माद्विचारेण स नाशनीयो यतो दुःखदः ॥ ५ ॥

पुरुषाला मनाच्या मोहानें कल्पित जो हा संसारसंबंधी बहुत काळचा वेताल, तो हा आत्मा, हें ब्रह्म, असें ज्ञान झालें व त्या-

विषयीं विचार झाला असतां नष्ट होतो. ज्याअर्थी हा मोह दुःखद आहे त्याअर्थी तो विचारानेंच नाश करण्यास योग्य आहे. ॥ ५ ॥

ईदृशी राम मायेयं या स्वनाशेन हर्षदा ॥
न लक्ष्यते स्वभावोस्याः प्रेक्ष्यमाणैव नश्यति ॥६॥

ईदृशीति । हे राम ईदृशी विलक्षणस्वभावा माया या स्वनाशेन हर्षप्रदा । विलोक्यमाना च नाशमाप्नोति । अतोऽस्याः स्वभावो न ज्ञायते ॥ ६ ॥

हे रामा माया कशी आहे ह्मणशील तर जी आपला नाश झाल्या असतां आनंद देणारी व तिला पाहिली असतां नाहींशी होणारी, ह्मणून जिचा स्वभाव जाणतां येत नाहीं. अशी विलक्षण स्वभावाची ही माया आहे. ॥ ६ ॥

अहो नु चित्रा मायेयं तात विश्वविमोहिनी ॥
सर्वाङ्गप्रोतमप्यात्मा ययात्मानं न पश्यति ॥७॥

अहो इति । हे तात अहो आश्चर्यमेतत् येयं चित्रा माया विश्वस्य मोहकारिका यया मोहितोऽयमात्मा शरीरसर्वांगव्याप्तमप्यात्मानं न जानाति ॥ ७ ॥

वसिष्ठ आश्चर्य करून ह्मणतात, रामा ! ही माया अशी विचित्र आहे कीं, हिणें आत्मा मोहित होऊन आपल्याला सुद्धां जाणत नाहीं. ॥ ७ ॥

यदिदं दृश्यते किञ्चित्तन्नास्ति किमपि ध्रुवम् ॥
यथा गन्धर्वनगरं यथा वारि मरुस्थले ॥ ८ ॥

यदिदमिति । यदिदं दृश्यमानं जगत्तत्किमपि नास्ति न भूतं न भविष्यति । यथा गन्धर्वनगरं यथा वारि मरुस्थले रविकिरणेषु जलधर्मः कालत्रयेऽपि नास्ति ॥ ८ ॥

आतां हें दिसणारें जें संपूर्ण जगत् हें सर्व खोटें आहे. तेव्हां कोणी शंका करील कीं, प्रत्यक्ष दिसतें आणि खोटें कसें, तर जसें गंधर्व नगर नसतां त्याचें भान होतें व रविकिरणांत कालत्रयींही उदक नसतां जलाचा भ्रम होतो त्याप्रमाणें जें दिसतें तो सर्व केवळ भ्रम आहे. ॥ ८ ॥

यत्तु नो दृश्यते किञ्चिदन्तस्थमपि किञ्चन ॥
अविनाशं तदस्तीह सत्सदात्मेति कथ्यते ॥ ९ ॥

यत्त्विति । यदन्ते समीपे स्थितमपि वस्तु किमपि न दृश्यते परंतु अविनाशं तद्रूपं तदस्ति स एव आत्मेति कथ्यते स एव साक्षात्करणीय इत्यर्थः ॥ ९ ॥

आतां आत्मस्वरूप सांगतात. समीप असतां दिसत नाहीं व ज्याचा नाश नाहीं तें आत्मस्वरूप, असें समजून तें जाणण्याविषयीं यत्न करावा. ॥ ९ ॥

स्वज्ञानदर्पणे स्फारे समस्ता वस्तुजातयः ॥
इमास्ताः प्रतिबिम्बन्ति सरसीव तटद्रुमाः ॥१०॥

स्वज्ञानेति । स्वकीये ज्ञानरूपे दर्पणे इमा दृश्यमाना वस्तुजातयः सर्वाः प्रतिबिंबितामापद्यन्ते । यथा तटद्रुमाः सरसि प्रतिबिम्बन्ति ॥ १० ॥

ज्याप्रमाणें उदकामध्यें किनाऱ्यावर असणाऱ्या वृक्षांचें प्रतिबिंब पहातो त्याप्रमाणें आपल्या ज्ञानरूप आरशामध्यें सर्व जगतांतील पदार्थ हे आत्म्याचे प्रतिबिंबरूपानें पहावे. ॥ १० ॥

सर्गश्चित्स्पंदमात्रात्मा सम्यग्दृष्टौ विलीयते ॥
उदेत्यसम्यग्दृष्टौ तु रज्जौ सर्पभ्रमो यथा॥११॥

सर्ग इति । चैतन्यस्पंदमात्ररूप एवायं सर्गः । सम्यक्

ज्ञाने सति नश्यति । मिथ्याज्ञाने सति उदयमाप्नोति । यथा तमसि दृश्यमानायां रज्जौ सर्पभ्रम उदेति रज्जुयाथार्थ्यज्ञानान्नश्यति च तद्वदित्यर्थः ॥ ११ ॥

चैतन्याचें जें स्पंदन त्याला सर्ग ह्म० उत्पत्ति ह्मणावें. तो सर्व चांगलें ज्ञान झालें असतां नष्ट होतो, आणि खोटें ज्ञान झालें तर उदय पावतो. उदाहरणार्थ अंधारांत रज्जूचे ठिकाणीं सर्पाचा जसा खोटा भ्रम होऊन भीति होते परंतु तेंच हा रज्जु आहे अशा ज्ञानानें ती भीति नष्ट होते त्याप्रमाणें. ॥ ११ ॥

भोगभावनया याति बन्धो दार्ढ्यमवस्तुजः ॥
तयोपशान्तया याति बन्धो जगति तानवम् ॥ १२ ॥

भोगेति । मिथ्याभूतोप्ययं बन्धो भोगवासनया दृढत्वं याति वासनाशान्त्या च बन्धोपि तानवं तनुतां तुच्छत्वं कार्श्यमाप्नोति तत्तस्मात्सा त्याज्येत्यर्थः ॥ १२ ॥

हा संसारबंध जरी मिथ्या आहे तरी भोगवासनेनें तो दृढ होऊन खरा वाटतो, परंतु तोच बंध उपशांतीच्या योगानें कृश होत्साता नाश पावतो. ॥ १२ ॥

मनः संपद्यते तस्मान्महतः परमात्मनः ॥
सुस्थिरादस्थिराकारं तरङ्ग इव वारिधेः ॥ १३ ॥

मन इति । व्यापकात्परमात्मनः सकाशात्स्थिरादस्थिराकारं चञ्चलं मन उत्पद्यते । स्थिरादस्थिरोत्पत्तौ दृष्टान्तः यथा स्थिरादपि समुद्रादस्थिरा ऊर्मयः उत्पद्यन्ते तद्वदित्यर्थः ॥ १३ ॥

आतां स्थिर जो परमात्मा त्यापासून अस्थिर ह्मणजे चंचल असें हें मन उत्पन्न होतें. यास दृष्टांत, स्थिर अशा समुद्रापासून जशा चंचल लाटा उत्पन्न होतात त्याप्रमाणें. ॥ १३ ॥

यत्स्वयं स्वैरमेवाशु संकल्पयति नित्यशः ॥
तेनेयमिन्द्रजालश्रीर्जाग्रति प्रवितन्यते ॥१४॥

यत्स्वयमिति । तदेव मनो यन्निरन्तरं संकल्पं करोति तेन संकल्पेन जाग्रदवस्थायां संसाररूपमिन्द्रजालमुत्पद्यते ॥ अत एव मनः संकल्पितः संसार इत्यर्थः ॥ १४ ॥

आतां संसारोत्पत्ति सांगतात. मन निरंतर जो संकल्प करितें त्या संकल्पानें जाग्रदवस्थेमध्यें हें संसाररूपी इंद्रजाल (खोटा भ्रम) उत्पन्न होतें. ॥ १४ ॥

यथा बालस्य वेतालो मृत्युपर्यन्तदुःखदः ॥
असदेव सदाकारं तथा मूढमतेर्जगत् ॥ १५ ॥

यथेति । यथा वेतालः प्रेतः बालस्य मूर्खस्य सर्वदा दुःखप्रदो भवति तथाऽमन्मिथ्याभूतमेवैतज्जगत् । भ्रांतबुद्धेर्नरस्य सत्याकारं भासमानं सन्मरणपर्यंतानि दुःखानि ददाति १५

जसा वेताळ (प्रेतरूपी पुरुष) मूढाला आमरणांत दुःख देतो त्याप्रमाणें हें मिथ्याभूत जगत् भ्रांतियुक्त नराला खरें भासून आमरणांत दुःख देतें. ॥ १५ ॥

अव्युत्पन्नस्य कनके कानके कटके यथा ॥
कटकव्यक्तिरेवास्ति न मनागपि हेमधीः ॥१६ ॥
तथाऽज्ञस्य पुरागारनगनागेन्द्रगोचरा ॥
इदं दृश्यं दृगेवास्ति नत्वन्या परमार्थदृक् ॥ १७ ॥

अव्युत्पन्नस्येति । तथाज्ञस्येति युग्मं ॥ यथा सुवर्णे अव्युत्पन्नस्य यावज्जीवं सुवर्णमजानतो नरस्य कनकनिर्मितकटककुंडलादौ कटकाद्येवेदमिति सत्यबुद्धिर्भवति । नत्विदं हेमेति कदापि बुद्धिस्तज्ज्ञानाभावादेवेति । तथाज्ञस्य पुंसो नगरगृह-

वृक्षपर्वतसर्पादिविषया दृश्यभूतैव बुद्धिः सत्यैव । परंतु विकारात्मकं सर्वं नामधेयमात्रमर्थाभावात् ॥ अधिष्ठानं परमार्थभूतदकपदार्थो ब्रह्मैवमत्सामितिबुद्धिः कदापि नोदेति । ब्रह्मज्ञानाभावादित्यर्थः ॥ १६ ॥ १७ ॥

जशी सुवर्णाविषयीं अव्युत्पन्न ह्मणजे आजन्मांत ज्याणें सुवर्ण पाहिलें नाहीं अशा मनुष्यांची बुद्धि सुवर्णाच्या अलंकाराचे ठिकाणीं सुवर्ण बुद्धि न होतां हीं कुडलें आहेत हीं कटकें आहेत अशी बुद्धि राहते. त्याप्रमाणें अज्ञाला जगतांविषयीं ब्रह्मबुद्धि न होतां हें नगर, हा गांव, हा पर्वत, हें झाड अशीच बुद्धि रहाते ॥ १६ ॥ १७ ॥

अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानन्दमयं जगत् ॥
अन्धं भुवनमन्धस्य प्रकाशं तु सचक्षुषः॥१८॥

अज्ञस्येति । पूर्वोक्तमेव विशदयति तत्वमजानतो विश्वं दुःखसमूहरूपमेव । तत्वज्ञस्य परमानंदरूपमेतत् । तत्रदृष्टान्तः तेन हीनस्य जगदन्धं तत्सहितस्य प्रकाशमेवेति ॥ १८ ॥

वरील अर्थच दृढ करितात. अज्ञाला हें जगत् दुःखसमूहरूपी आहे आणि ज्ञान्याला आनंदमय असें आहे. जसें अंधाला संपूर्ण भुवन आंधळें भासतें तेंच ज्याला दृष्टि आहे त्याला प्रकाशमान दिसतें त्याप्रमाणें. ॥ १८ ॥

यथा विशुद्ध आकाशे सहसैवाभ्रमण्डलम् ॥
भूत्वा विलीयते तद्वदात्मनीहाखिलं जगत् ॥१९॥

यथेति । यथा स्वतः शुद्धेऽपि गगने मेघपटलं भूत्वा पुनर्नश्यति ॥ तद्वद्ब्रह्मणि सर्वं जगदुत्पद्यते लीयते च ब्रह्मणो न किंचिद्दोषावहम् ॥ १९ ॥

जसें स्वच्छ आकाशाचे ठिकाणीं अकस्मात् अभ्र उत्पन्न हो-

ऊन पुनः कांहीं कालानें तें नष्ट होतें तसें आत्म्याचे ठिकाणीं हें जगत् उत्पन्न होऊन नष्ट होतें ॥ १९ ॥

आदित्यव्यतिरेकेण रश्मयो येन भाविताः ॥
आदित्या एव ते तस्य निर्विकल्पः स उच्यते॥२०॥

**आदित्येनेति । येन सूर्यकिरणाः सूर्याद्भेदे न ज्ञातास्तस्य ते किरणाः सूर्यात्मका एवेति यथा तथा येन ब्रह्माभिन्नं जगज्ज्ञातं तस्य तद्ब्रह्मैव । स निर्विकल्प उक्तः ॥ २० ॥**

सूर्यकिरण सूर्यापासून उत्पन्न झाले असें ज्याला माहित आहे, त्याला ते जसे सूर्यरूपीच आहेत असें भासतें, त्याचप्रमाणें ब्रह्मापासून उत्पन्न हें जगत् आहे असें ज्याला माहीत आहे तो हें जगत् ब्रह्मच आहे असें विकल्परहित मानतो ॥ २० ॥

तन्तुमात्रो भवत्येव पटो यद्वद्विचारितः ॥
आत्मतन्मात्रमेवेदं तद्वद्विश्वं विचारितम् ॥२१॥

**तन्त्विति । यथा विचारितः पटस्तन्तुमात्र एव तिर्यगूर्ध्वीभूतं तन्तुव्यतिरेकेण पटाभावात् । तथा विचारितं विश्वं ब्रह्मैव जगदाकारेण ब्रह्मण एव परिणामादित्यर्थः ॥ २१ ॥**

आडव्या उभ्या तंतूपासून आलेला पट ह्मणजे वस्त्र जसें तंतूच आहे त्याप्रमाणें जगत् हें ब्रह्मच आहे आतां एकप्रकारचा त्याला आकार मात्र आला आहे. ॥ २१ ॥

विश्ववीचिविलासोयं चित्सुधाब्धेरुदेति च ॥
विलीयते च तत्रैव मध्ये कथमतन्मयः ॥२२॥

**विश्ववीचीति । ब्रह्मरूपादमृतसमुद्राज्जगल्लक्षणः कल्लोलविलास उदेति तत्रैव लीयते चेन्मध्ये कथं तन्मयो न स्यात् यथा जलादुद्भूता लहरी लीयमाना वा जले लहरीदशायामपि जलात्मिकैव ॥ २२ ॥**

ब्रह्मरूपी जो अमृतसमुद्र त्यापासून उत्पन्न झालेला जो जगद्रूपी लहरींचा समुदाय तो केव्हांही ब्रह्ममयच आहे. त्याला दृष्टांत कीं, जलापासून झालेल्या ज्या लाटा त्या लाटा या स्थितींत असतांही जलरूपीच असतात त्याप्रमाणें. ॥ २२ ॥

यथा न तोयतो भिन्नाः फेनोर्मिहिमवुद्बुदाः ॥
आत्मनोपि तथाभिन्नं विश्वमात्मविनिर्गतम् ॥२३॥

यथेति । जलादुद्गताः फेनलहरीहिमबुद्बुदाः जलान्न भिन्नाः तथा ब्रह्मणो विनिर्गतं विश्वं न ततो भिन्नं । कार्यकारणयोरभेदादित्यर्थः ॥ २३ ॥

जलापासून उत्पन्न झालेलीं जीं लाटा, फेन, बुद्बुद इत्यादि हीं जशी जलापासून निराळीं नाहींत, त्याप्रमाणें ब्रह्मापासून उत्पन्न जें विश्व तें त्याहून निराळें नाहीं. कारण, कार्य आणि कारण ह्यांचा केव्हांही भिन्नपणा नाहीं. ॥ २३ ॥

आत्मनोऽपि तथा विश्वमात्मन्येव लयं व्रजेत् ॥
मृदि कुम्भो जले वीचिः कनके कुण्डलं यथा॥२४॥

आत्मन इति । ब्रह्मण एव उत्पन्नं विश्वं तत्रैव लीयते । तत्र दृष्टान्तत्रयमाह मृदीति मृत्तिकायां घटो यथा । जले लहरी यथा । कनके सुवर्णे आभरणं यथा ॥ तद्वदात्मनोपि विश्वमात्मन्येवेत्यर्थः ॥ २४ ॥

ज्याप्रमाणें मृत्तिकेपासून उत्पन्न झालेला घट अखेर मृत्तिकेंत मिळतो. तशाच लाटाही उदकांतच लीन होतात व कुंडलादि अलंकार सुवर्णांतच लीन होतात त्याप्रमाणें ब्रह्मापासून उत्पन्न जें हें विश्व तें त्या ब्रह्मामध्यें लीन होतें. ॥ २४ ॥

आत्माज्ञानाज्जगद्भाति ह्यात्मज्ञानान्निवर्तते ॥
रज्ज्वज्ञानादहिर्भाति तज्ज्ञानाच्च निवर्तते ॥२५॥

आत्मेति । ब्रम्हणोऽज्ञानाद्विश्वं भासते । ब्रम्हज्ञानाच्च नास्ति । यथा रज्ज्वज्ञानात्सर्पो भासते रज्जुज्ञाने सर्पो नास्ति ॥ २५ ॥

आत्म्याचे अज्ञानानें हें जगत् आहे असें वाटतें व आत्मज्ञानानें तें खोटें आहे असें होतें. यास दृष्टांत दोरीच्या अज्ञानानें सर्पाचा भास होतो, परंतु तीच दोरी आहे असें ज्ञान झालें ह्मणजे तो सर्प खोटा होतो. ॥ २५ ॥

तस्यादृश्यात्मतत्वस्य विस्मृत्यैव स्थिरतिं गतम् ॥
जगत्स्यादीश्वराद्राम जगद्रज्जुभुजङ्गवत् ॥२६॥

तस्येति। हे राम अदृश्यस्य दुर्ज्ञेयस्यात्मतत्वस्य विस्मरणेन जगत्स्थिरतां प्राप्तं तज्ज्ञानान्नास्ति । यथारज्जुज्ञानाद्भुजङ्गो नास्ति ॥ २६ ॥

अदृश्य जें आत्मतत्व त्याच्या अज्ञानानें ह्मणजे विस्मरणानें हें जगत् स्थिर आहे असें वाटतें परंतु तो वास्तविक भ्रम आहे. तो आत्मज्ञानानें नष्ट होतो. जसा दोरी आहे असें ज्ञान झाल्यानंतर सर्पभ्रम जातो त्याप्रमाणें ॥ २६ ॥

स्वप्ने जाग्रदसद्रूपा स्मृतौ जाग्रदसद्वपुः ॥
मृतिर्जन्मन्यसद्रूपा मृतौ जन्माप्यसन्मयं ॥२७॥
एवं न सन्नासदिति भ्रान्तिमात्रं विजृम्भते ॥
अनुभूयत एवाशु किञ्चित्सर्वानुभूतितः ॥ २८ ॥

इति लघुयोगवासिष्ठसारे द्वितीयं प्रकरणम् ॥

स्वप्न इति । एवमिति श्लोकद्वयेन ॥ यथा स्वप्ने जाग्रदवस्था नास्त्येव स्मरणे च जागरणमपि मिथ्यैव ॥ मरणे उत्पत्तिर्मिथ्याभूता उत्पत्तौ मरणं तद्वत् । एवं सदसच्च स्थूलसूक्ष्मं कार्यकारणं वा तन्तुपटादिकं किंचिन्नास्ति किन्तु

भ्रान्त्या सर्वमिदं भासते । किञ्च सर्वमूलभूताज्ज्ञानरूपाद्ब्रम्हण एव नाना ज्ञानानि भवन्ति ब्रम्हसत्तयैव विश्वसताङ्गीकारात्तद्व्यतिरेकेण किञ्चिन्नास्तीत्यर्थः ॥ २७ ॥ ॥ २८ ॥ इति योगवासिष्ठसारे टीकायां द्वितीयं प्रकरणम् ॥ २ ॥

ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें जागृदवस्था नाहीं व स्मरणकालीं जागृदवस्था नाहीं तसें उत्पत्तिकालीं मरण मिथ्या आहे आणि मरणकालीं उत्पत्ति मिथ्या आहे. तसेंच हें सर्व स्थूल आणि सूक्ष्म ह्म० कार्य कारण मिथ्या आहे. जें भासतें हा सर्व केवळ भ्रम आहे आणि ब्रह्म हें सत्य आहे व त्याचेपासून नानाप्रकारची ज्ञानें होतात ह्मणून त्यावांचून कांहीं नाहीं. ॥ २७ ॥ २८ ॥ याप्रमाणें हें द्वितीय प्रकरण समाप्त झालें. ॥ २ ॥

# जीवन्मुक्तलक्षणं तृतीयं प्रकरणम्

वसिष्ठ उवाच॥तत्वात्मबोध एवैकः सर्वाशातृणपावकः॥
प्रोक्तः समाधिशब्देन नतु तूष्णीमवस्थितिः ॥ १ ॥

इदानीं जीवन्मुक्तिफलकं तत्वज्ञानं वर्णयति । तत्वेति परमात्मासाक्षात्कारेणात्मज्ञानमेवैकं विषयतृष्णारूपतृणानां दाहकं भवति । तदेव तृणादाहकं ब्रह्मज्ञानं समाधिशब्देनोच्यते । नत्वेकांते मौने नावस्थानमात्रं समाधिशब्दार्थः ॥१॥

॥ आतां तत्वज्ञानाविषयीं वर्णन करितात ॥

प्रथम समाधीचें लक्षण सांगतात. परमात्म्याच्या साक्षात्कारानें प्राप्त झालेलें व विषयरूपतृणाला दाहक असें जें ब्रह्मज्ञान त्याला समाधि ह्मणावें. एकांतीं मौन धारण करणें ही समाधि नव्हे ॥१॥

चिदाकारमिदं सर्वं जगदित्येव भावयेत् ॥
यस्तिष्ठत्युपशान्तस्थः स ब्रह्मकवचः सुखी ॥२॥

चिदिति । इदं सर्वं जगत् ब्रह्मस्वरूपमेवेति भावयेत् ईदृशभावनया युक्त उपशांते ब्रम्हणि यः स्थितः स एव च सुखं जानाति ॥ यतो ब्रह्मकवचो ब्रह्मैव कवचं रक्षकं यस्य स तथा ॥ २ ॥

हें सर्व जगत् ब्रह्मस्वरूप आहे अशी भावना करावी. मग अशा भावनेनें युक्त झाला ह्मणजे तोच स्वतः उपशांत ब्रह्म-स्वरूपांत राहून सुख भोगतो. कारण, ब्रह्म हेंच त्याला कवच हो-ऊन रक्षण करितें ॥ २ ॥

सर्वातीतपदालम्बी पूर्णेन्दुशिशिराशयः ॥
यस्तिष्ठति सदा योगी स एव परमेश्वरः ॥ ३ ॥

सर्वेति । एवंविधो योगी ब्रम्हणैकीकृतचित्तो यस्तिष्ठति स परमेश्वर एव नान्यः ॥ कीदृशः सर्वातीतं ब्रह्मपदमेवालं-बते आश्रयति स तथा । पूर्णेन्दुवच्छिशिरः शीतल आशय-श्चित्तं यस्य स तथा ॥ ३ ॥

ब्रह्मपदाचेंच अवलंबन करणारा व पूर्ण चंद्राप्रमाणें शांत ज्याचें मन झालें असा व ब्रह्माशीं ज्याचें चित्त मिळालें तो केवळ परमेश्वर समजावा. ॥ ३ ॥

ब्रह्मोपनिषदां तत्वं भावयन्योन्तरात्मना ॥
नोद्वेगी न च तुष्टात्मा संसारे नावसिदति ॥ ४ ॥

ब्रम्हेति । यश्चित्तेन ब्रम्हप्रतिपादकानामुपनिषदां तत्वं भावयन्हर्षविषादरहितो भवति । स एव संसारे दुःखरहितो भवति ॥ अन्यः सर्वो दुःखवानेवेत्यर्थः ॥ ४ ॥

ब्रह्मप्रतिपादक जीं उपनिषदें त्यांतील तत्वांचा विचार करून जो हर्षशोकरहित होतो. तोच संसारामध्यें दुःखरहित असतो त्यावांचून इतर दुःखभोक्ता समजावा ॥ ४ ॥

यथा पर्वतमादीप्तं नाश्रयन्ति मृगा द्विजाः ॥
तद्वद्ब्रह्मविदो दोषा नाश्रयन्ति कदाचन ॥ ५ ॥

यथेति । यथा दावाग्नितप्तं दग्धं पर्वतं मृगपक्षिणो न सेवंते तद्वत्कामक्रोधादयो दोषाः ब्रह्मज्ञं कदापि नाश्रयन्ते ॥ ५ ॥

वडवाग्नीनें प्रज्वलित पर्वताचा आश्रय जसे मृगादिक करीत नाहींत, त्याप्रमाणें कामक्रोधादिक दोष ब्रह्मज्ञान्याचा आश्रय करीत नाहींत. ॥ ५ ॥

असन्त इव सन्तोपि कोपयन्ति परं नरम् ॥
निजं कर्मगुणोदारं परिपाकं परीक्षितुम् ॥ ६ ॥

असन्त इति । सन्तोपि असन्त इव परं नरं कोपयन्ति । असन्तः कोपावेशेन परं क्रोधयन्ति । सन्तस्त्वन्तरशीतला आपि तथा आचरन्ति यथा परः क्रुध्यति । तर्हि कथमाचरन्ति तत्राह । निजमिति । परिपाकभूतं निजं कर्म परीक्षितुं । अयमर्थः । कोपितेऽन्यनरे यथा असंतो बध्यंते तथा अस्माकं भवति नवेति स्वकर्मपरीक्षार्थं । तेषां तु बाधो न भवतीत्यर्थः ॥ ६ ॥

असाधु जसे आपल्या साहजीक धर्मानें दुसऱ्यावर कोप करितात त्याप्रमाणें साधूहि परिपाक पावलेल्या आपल्या कर्माची परीक्षा करण्याकरितां दुसऱ्यावर कोप करितात. यांतील हेतु इतकाच कीं, ते जसे त्याकोपानें बद्ध होतात तसे आपण होतों किंवा कसें इतकें पहाण्याकरितां मुद्दाम कोप करितात ॥ ६ ॥

ज्ञात्वाप्यसर्पं सर्पोत्थं यथा कम्पं न मुञ्चति ॥
विध्वस्ताखिलमोहोपि मोहकार्यं तथात्मनि ॥ ७ ॥

ज्ञात्वेति । यथा रज्जौ सर्पभ्रमान्तरं रज्जुज्ञाने जातेऽ

सर्पोत्थं भयमनुवर्तत एव एवं ब्रह्मज्ञानेन नाशितनिखिलमोहोऽपि आत्मनि मोहकार्यं क्रोधलोभादिकं न मुञ्चति ॥७॥

सर्पभ्रमानंतर खरोखर रज्जूचें ज्ञान झालें असतांही जसे कंपादिक असतात, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञानानें अखिल मोहाचा नाश झाला तरी मोहापासून होणारे जे आत्म्याचे ठिकाणीं कामक्रोधादिक ते असतात. नंतर कांहीं कालानें त्याच ज्ञानानें ते नष्ट होतात. ॥ ७ ॥

स्फटिकः प्रतिम्बिम्बेन यथा नायाति रञ्जनम् ॥
तज्ज्ञः कर्मफलेनान्तस्तथा नायाति रञ्जनम् ॥ ८ ॥

एवं तर्हि ब्रम्हज्ञस्यापि कर्मबन्धः प्रसक्तइत्यतआह स्फटिक इति । यथा निर्मलस्फटिको जपाकुसुमादीनां प्रतिबिम्बेऽपि वस्तुतो रञ्जनं नायाति रक्तो न भवति। तद्वज्ज्ञानी कर्म कुर्वन् दृश्यमानोऽपि कर्मणा न बध्यते ॥ ८ ॥

जसा स्फटिक बाहेर अनेक रंगांनीं युक्त झाला तरी स्वतः आंत त्या रंगांनीं युक्त होत नाहीं, तसा ब्रह्मज्ञानी कर्मफलांनीं युक्त झाला तरी आंत त्या कर्मफलानें युक्त होत नाहीं ॥ ८ ॥

अन्तर्मुखतया तिष्ठन्बहिर्वृत्तिपरोऽपि सन् ॥
परिश्रान्ततया नित्यं निद्रालुरिव लक्ष्यते ॥ ९ ॥

अंतरिति । बहिरिन्द्रियैर्विषयग्रहणं कुर्वन्नपि ज्ञानी अन्तर्मुखतया आत्मतया तिष्ठन्निद्रायुक्त इव लक्ष्यते । यतः संसारतापाच्छ्रान्तो निवृत्तः ॥ ९ ॥

बाहेरील वृत्तीनें जरी युक्त असला तरी जो अन्तर्मुख आहे तो जसा परिश्रांत झालेला मनुष्य झोप घेतो त्याप्रमाणें दिसतो. कारण, संसारपरितापापासून तो श्रांत असतो. ॥ ९ ॥

अद्वैते स्थैर्यमायाते चित्ते च प्रशमं गते ॥
योगिनः कर्म कुर्वन्ति पश्यन्तः स्वप्नवज्जगत् ॥१०॥

अद्वैत इति । चित्ते शान्तिं गते सति अत एव ब्रह्मणि स्थिरतामागतेऽपि योगिनो जगत् स्वप्नवत्पश्यन्तः संतः कर्म कुर्वन्ति । ब्रह्मज्ञानेन जातसाक्षात्काराणां कृतेऽपि कर्मणि बंधो नास्तीति भावः ॥ १० ॥

आतां योगी अद्वैत जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं स्थिर झाले असतां व हें जगत् स्वप्नाप्रमाणें मानित असतांहि कर्म करितात. तात्पर्य इतकेंच कीं, ब्रह्म साक्षात्कार झाल्यानंतर जरी कर्म केलें तरी त्यांनें बंधन प्राप्त होत नाहीं. ॥ १० ॥

अद्यैव मरणं वास्तु कल्पान्तनिचयेन वा ॥
तज्ज्ञः कलङ्कं नाप्नोति हेम पङ्कगतं यथा ॥ ११ ॥

अद्यैवेति । अद्यैव मरणमस्तु कल्पान्तपर्यन्तं वा जीवतु तथापि ज्ञानी बन्धनं नाप्नोति । यथा सुवर्णं कर्दमक्षिप्तमपि कलङ्कं नाप्नोति तद्वत् ॥ ११ ॥

आज मरण प्राप्त होवो अगर कल्पांतीं होवो तथापि ज्ञानी केव्हांही बंधन पावत नाहीं, यास दृष्टांत. जसें सुवर्ण चिखलांत असो अगर कोठेंही असो परंतु त्याला कलंक लागत नाहीं त्याप्रमाणें. ॥ ११ ॥

तनुं त्यजतु वा काश्यां श्वपचस्य गृहेऽथवा ॥
ज्ञानसंप्राप्तिसमये मुक्तोऽसौ विगताशयः ॥ १२ ॥

तनुमिति । ज्ञानी धीरपुरुषः काश्यां तनुं देहं त्यजतु चांडालागारेऽपि च तथापि मुक्त एव । यतो ज्ञानप्राप्तिसमय एव विगतचित्तोभिन्नलिंगोजातस्ततो मुक्त इत्यर्थः ॥ १२ ॥

ज्याच्या सर्व आशा नष्ट झाल्या आहेत असा जो ज्ञानी पुरुष, तो आपला देह काशी आदिकरून पवित्रस्थलीं टाको अगर चांडलगृह आदिकरून अपवित्रस्थलीं टाको परंतु तो मुक्तच आहे, कारण

